महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगास वेतन व वेतन बाबीकरिता सन २०२५-२६ या आर्थिक वर्षात अनुदान वितरीत करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
अल्पसंख्याक विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक:- राअआ-२०२५/प्र.क्र.४८/का-९
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: २१ एप्रिल, २०२५.

वाचा :-

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं- २०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.७ एप्रिल, २०२५.

२) सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग यांचे पत्र क्र.राअआ/लेखा/प्र.क्र.०१/का-०४/२०२५-२६, दिनांक ०७.०४.२०२५.

प्रस्तावना :-

महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयातील अधिकारी / कर्मचारी यांचे माहे मार्च, २०२५ ते जून, २०२५ या कालावधीतील वेतन व वेतनावरील बाबींकरीता अनुदान उपलब्ध करून देण्याबाबत उपरोक्त संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग यांनी शासनास विनंती केली आहे. त्यानुसार सन २०२५-२६ या आर्थिक वर्षात मागणी क्रमांक झेडई -१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम (०१) (१६) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २४९ (अनिवार्य), ३६ सहायक अनुदाने (वेतन)" या लेखाशिर्षा अंतर्गत अर्थसंकल्पीत निधीपैकी बीम्स प्रणालीवरील उपलब्ध निधी मधून महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयातील अधिकारी / कर्मचारी यांच्या वेतन व वेतनबाबीकरीता अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयासाठी सन २०२५-२६ या आर्थिक वर्षामध्ये "मागणी क्र. झेडई -१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम (०१) (१६) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २४९ (अनिवार्य), ३६, सहायक अनुदाने (वेतन)" या लेखाशिर्षांतर्गत एकूण **रु.१,०८,६८,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी आठ लक्ष अडुसष्ट हजार फक्त)** इतकी अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात आली आहे.

२. उपरोक्त संदर्भ क्र.१ येथील वित्त विभाग, शासन परिपत्रक दिनांक ०७ एप्रिल, २०२५ मधील मार्गदर्शक सुचनांनूसार लेखाशिर्ष २२३५ ए २४९ (अनिवार्य), ३६ सहायक अनुदाने (वेतन)" या लेखाशिर्षांतर्गत सद्यस्थितीत अर्थसंकल्पित निधीपैकी एकूण **रु.९,७८,१२०/-** (अक्षरी रुपये नऊ लक्ष अठ्याहत्तर हजार एकशे वीस फक्त) इतका निधी वितरणासाठी उपलब्ध आहे. त्यानुसार, सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग यांनी संदर्भ क्र.२ च्या पत्रान्वये मागणी केल्यानुसार, बीम्स प्रणालीवरील उपलब्ध निधीतून **रु.९,७८,१२०/-** (अक्षरी रुपये नऊ लक्ष अठ्याहत्तर हजार एकशे वीस फक्त) इतके अनुदान महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगास वितरित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर तरतूद सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत असून याकरीता, अवर सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई हे आहरण व संवितरण अधिकारी तर सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई हे नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील. महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाने सन २०२५-२६ च्या मासिक निधी विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे आयोगाच्या कार्यालयाचा खर्च विहित मर्यादेत राहील याची दक्षता घेण्यात यावी. वेतन या लेखाशिर्षांतर्गत वितरीत करण्यात आलेला निधी त्याच उद्दिष्टासाठी खर्च करण्यात यावा. या आदेशान्वये वितरीत करण्यात आलेल्या निधीतून केलेल्या खर्चाचा तपशील, उपयोगिता प्रमाणपत्र Utilization Certificate शासनास सादर करावे. तसेच संदर्भ क्र. (१) मधील वित्त विभागाच्या शासन परिपत्रकान्वये विहीत अटी व तरतुदींचे काटेकोरपणे पालन महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांनी करावे.

४. उपरोक्त बाबीवरील खर्च “मागणी क्र. झेडई -१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम (०१) (१६) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २४९ (अनिवार्य), ३६, सहायक अनुदाने (वेतन)” या लेखाशिर्षाखाली सन २०२५-२६ या वर्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा.

५. “सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग पहिला, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दि. १७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत किंवा त्या त्या विभागास वेळोवेळी वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग -२ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२५/ प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.७/०४/२०२५ मधील अटींची तसेच सोबतच्या परिशिष्टामधील सर्व बाबींची पुर्तता करण्याच्या अटीस अनुसरुन सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.”

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०४२११५०५२२८९१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by MILIND PADMANABH SHENOY
Date: 2025.04.21 15:06:21 +05'30'

**( मि. प. शेणॉय )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई
२. महालेखापाल-१ (लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
५. अवर सचिव, ( व्यय-४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२
६. कक्ष अधिकारी, (का-७) , अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२
७. निवडनस्ती ( कार्या.९ ).